**नवनिर्मित नगरपरिषदा / नगरपंचायतींमध्ये संबंधित तत्कालीन ग्रामपंचायतींच्या कर्मचाऱ्यांच्या समावेशनासाठी विहीत अटी व कार्यपध्दती मध्ये सुधारणा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. एमसीओ-२०१७/प्र.क्र.२२/नवि-१४**
मंत्रालय (मुख्य इमारत), ४ था मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मुंबई ४०० ०३२
दि. २० ऑगस्ट, २०१८

संदर्भ :- १. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एमसीओ-२०१५/प्र.क्र.१३९/नवि-१४, दि.१९.०१.२०१७.
२. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एमसीओ-२०१७/प्र.क्र.२२/नवि-१४,दि.३०.११.२०१७.
३. नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांचे क्र.नपप्रसं/नगरपरिषद पदनिर्मिती/२०१७/ प्र.क्र.७ /२०१७ /कक्ष-६/१०८८, दि.१२.०४.२०१८ चा प्रस्ताव.

**प्रस्तावना:-**

राज्यातील नवनिर्मित नगरपरिषदा / नगरपंचायतींमध्ये कार्यरत तत्कालीन ग्रामपंचायत कर्मचाऱ्यांचे समावेशन करण्याबाबतचे धोरण संदर्भाधीन अ.क्र.१ येथील दि.१९.०१.२०१७ च्या शासन निर्णयान्वये विहित करण्यात आले आहे. नगरपरिषद प्रशासन संचालनालयाने दि.०७.०२.२०१७ च्या आदेशान्वये समावेशनासाठी अर्हता निश्चित केली होती. तथापि, त्यानुसार समावेशन करण्यात येणाऱ्या अडचणीसंदर्भाम कर्मचारी संघटनांनी वारंवार निवेदने दिली. या संदर्भात क्षेत्रिय स्तरावरुन प्राप्त झालेला अहवाल विचारात घेऊन, समावेशनाची सुधारित कार्यपध्दती दि.३०.११.२०१७ च्या शासन निर्णयान्वये विहित करण्यात आली.

२. तथापि कर्मचारी संघटनानी समावेशनासाठीच्या विहित शैक्षणिक अर्हतेत व अन्य सेवा विषयक बाबींमध्ये देखील सवलत / सूट मिळण्याची विनंती शासनाकडे केली होती. सदर मागण्यांसंदर्भात नगरपरिषद संचालनालयाकडून अहवाल मागविण्यात आला होता. याबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये आयुक्त तथा संचालक यांनी शासनाकडे सादर केला आहे. तद्नुषंगाने, नवनिर्मित नगरपरिषदा / नगरपंचायतींमध्ये तत्कालीन ग्रामपंचायतींच्या कर्मचाऱ्यांच्या समावेशना संदर्भातील विहीत अर्हता व कार्यपध्दती याबाबत सुधारणा करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. त्या अनुषंगाने, आता खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहेत.

**शासन निर्णय: -**

नवनिर्मित नगरपरिषदा / नगरपंचायतींमधील कार्यरत तत्कालीन ग्रामपंचायत कर्मचाऱ्यांच्या समावेशनासंदर्भात नगरपरिषद प्रशासन संचालनालयाने सादर केलेल्या अहवालानुसार आता याबाबतच्या अर्हता व कार्यपध्दती यामध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

**लिपीक पदावरील समावेशनासाठीच्या विहीत शैक्षणिक अर्हतेत सुधारणाः-**

(अ) जे कर्मचारी त्यांच्या ग्रामपंचायतींमधील नेमणूकीच्या दिनांकास, मुंबई ग्रामपंचायत नोकराबाबतच्या सेवेच्या शर्ती नियम १९६० च्या नियम ४-अ मधील तरतूदीनुसार विहीत केलेली शांलात परीक्षा उत्तीर्ण (१० वी पास) ही शैक्षणिक अर्हता धारण करत असतील, असे कर्मचारी यापूर्वीच्या संदर्भाधीन अ.क्र.१ व २ येथील शासन निर्णयान्वये विहीत केलेल्या अन्य अटींची पूर्तता करीत असल्यास, त्यांना समावेशनासाठी पात्र समजण्यात यावे.

**समावेशनानंतर सेवाज्येष्ठता व निवृत्तीवेतन विषयक लाभांसाठी दिनांक निश्चितीः-**

(अ) नगरपरिषद/ नगरपंचायतीत सामावून घेतलेल्या कर्मचाऱ्याची सेवा ज्येष्ठता निश्चित करताना संबंधित कर्मचाऱ्यास ग्रामपंचायतीने कायम केलेला दिनांक ग्राह्य मानण्यात यावा.

(ब) संबंधित कर्मचाऱ्याच्या समावेशनानंतर निवृत्ती वेतन, आश्वासित प्रगती व इतर निवृत्ती वेतन विषयक लाभासाठी नगरपरिषदेच्या / नगरपंचायतीच्या स्थापना दिनांकापासून सेवा धरण्यात यावी.

**मुकादम पदावरील समावेशनासाठी तरतूदः-**

(अ) विहित शैक्षणिक अर्हता धारण करणारा व सफाई विभागातील (आरोग्य विभागातील) मुकादम पदावर कार्यरत असणारा ग्रामपंचायत कर्मचारी मुकादम या पदावर समावेशनासाठी पात्र समजण्यात यावा.

उपरोक्त बाबींव्यतिरिक्त अन्य बाबींसाठी यापूर्वी संबंधित नगरपरिषद / नगरपंचायतींचे आकृतीबंध निश्चित करताना निर्गमित केलेल्या संबंधित शासन निर्णयाप्रमाणे व नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एमसीओ-२०१५/प्र.क्र.१३९/नवि-१४, दि.१९.०१.२०१७, दि.३०.११.२०१७ तसेच, संचालनालयाच्या दि.०७.०२.२०१७ अन्वये विहीत केलेल्या अन्य अटी / निकष / कार्यपध्दती लागू असतील.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८२०१४५४५५८५२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay S Gokhale

Digitally signed by Sanjay S Gokhale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ab8a7eeedad158d24cf530f0d6b662808245be49a8459ed4c63961ebdc3cb961, cn=Sanjay S Gokhale
Date: 2018.08.20 14:58:09 +05'30'

(सं.श.गोखले)
सह सचिव

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री महोदयांचे अमुस, मंत्रालय, मुंबई.
२. मा.विरोधी पक्षनेते, दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
३. मा.राज्यमंत्री (नवि) महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई.

६. विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक (सर्व).
७. जिल्हाधिकारी (सर्व).
८. सर्व नगरपरिषदा / नगरपंचायती यांचे मुख्याधिकारी.
९. निवडनस्ती (नवि-१४).